**इंडियन प्रिमीयर लीग (आय.पी.एल.) - २०१७ अंतर्गत वानखेडे स्टेडियम, मुंबई येथे होणाऱ्या २०-२० क्रिकेट सामन्यांकरीता इंटरनेटद्वारे तिकीट आरक्षण करुन तसेच प्रत्यक्ष तिकीट केंद्रांवर संगणकीकृत तिकीट विक्रीस तसेच थेट तिकीट विक्रीस मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएनटी-२०१७/प्र.क्र.२५/टी-१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७ मार्च, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.ईएनटी-१०९९/प्र.क्र.२१५/टी-१, दि. २१.९.२०००.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.ईएनटी-१००७/प्र.क्र.२९/भाग-१/टी-१, दि.१४.६.२०१०.
३) प्राधिकृत स्वाक्षरीकर्ता, मे. इंडियाविन स्पोर्टस् प्रा. लि., मुंबई यांचे दि.३०.०१.२०१७ चे पत्र.

प्रस्तावना :-

बोर्ड ऑफ कंट्रोल फॉर क्रिकेट इन इंडिया, मुंबई (बी.सी.सी.आय) यांचेद्वारे वानखेडे स्टेडियम, मुंबई येथे आयोजित **इंडियन प्रिमियर लीग (आय.पी.एल.)** क्रिकेट सामन्यांकरीता मे. इंडियाविन स्पोर्टस् प्रा. लि., मुंबई यांची अधिकृत अभिकर्ता (Franchisee) म्हणून बी.सी.सी.आय., मुंबई यांचेकडून नियुक्ती करण्यात आली आहे. **सन २०१७** करीता सदर सामने **दि.०५ एप्रिल,२०१७ ते २१ मे, २०१७** या कालावधीमध्ये वानखेडे स्टेडियम, मुंबई येथे आयोजित करण्यात येत आहेत.

संदर्भाधीन दि.१४.६.२०१० च्या शासन निर्णयान्वये ***" पाच दिवसांचे कसोटी क्रिकेट सामने सोडून इतर सर्व प्रकारच्या आंतरराष्ट्रीय क्रिकेट सामन्यांवर तसेच आय.पी.एल. व तत्सम सामन्यांवर"*** महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियमातील **कलम ३(१)(ब)** मधील तरतुदींनुसार करमणूक शुल्क आकारण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

त्यानुषंगाने, मे. इंडियाविन स्पोर्टस् प्रा. लि., मुंबई यांनी संदर्भाधीन पत्रान्वये केलेल्या विनंतीचा विचार करून **इंडियन प्रिमियर लीग (आय.पी.एल.)-२०१७ अंतर्गत दि.०५ एप्रिल,२०१७ ते २१ मे, २०१७ या कालावधीत वानखेडे स्टेडियम, मुंबई** येथे आयोजित करण्यात येणा-या **एकूण सात २०-२० क्रिकेट सामन्यांकरीता** इंटरनेटद्वारे तिकीट आरक्षण करुन संगणकाद्वारे तसेच प्रत्यक्ष तिकीट केंद्रावर संगणकीकृत तिकीट विक्री तसेच थेट तिकीट विक्री करण्याकरीता महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियमातील तरतुदींनुसार व संदर्भाधीन दि.२१.९.२००० व दि.१४.६.२०१० च्या शासन निर्णयांमधील तरतुदींनुसार मे. इंडियाविन स्पोर्टस् प्रा. लि., मुंबई यांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

**इंडियन प्रिमियर लीग (आय.पी.एल.)-२०१७ अंतर्गत दि.०५ एप्रिल,२०१७ ते २१ मे, २०१७ या कालावधीत वानखेडे स्टेडियम, मुंबई** येथे आयोजित करण्यात येणा-या **एकूण सात २०-२० क्रिकेट सामन्यांकरीता** मे. इंडियाविन स्पोर्टस् प्रा. लि., मुंबई या अभिकर्ता संस्थेस इंटरनेटद्वारे तिकीट आरक्षण करण्यास व तिकीट विक्री केंद्रावर संगणकीकृत तिकीट तसेच थेट तिकीट विक्रीस उपलब्ध करुन देण्यास पुढील कार्यपध्दतीचा अवलंब करण्याच्या अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे. :-

***I आय.पी.एल. सामन्यांची तिकीट विक्री :-***

i) आय.पी.एल. २०-२० क्रिकेट सामन्यांकरीता तिकीट विक्री केंद्रांमध्ये प्रत्यक्ष तिकीट उपलब्ध करुन देण्याकरिता **प्रत्येक रोलमध्ये २५० तिकीटे अथवा त्या पटीत तिकीटे** असावीत. प्रत्येक तिकीटावर शासनाने विहित केल्यानुसार मुद्रित करावयाच्या मजकूराशिवाय प्रायोजकांचे नाव व लोगो याची छपाई करण्याची मुभा राहील.

ii) तिकीट विक्री करण्याकरीता व्यवस्था असलेल्या प्रत्येक विक्री केंद्राकरिता स्वतंत्र संकेतांक असावा. तिकीटावर **"ए" टू "झेड"** या अक्षरांनी सुरु होणारी मालिका असावी.

iii) तिकीट विक्री करणाऱ्या संस्थेने प्रत्येक तिकीटाची छपाई ***"A", "D" व "P" अशी किमान तीन भागांत करण्यात यावी.*** *तिकीटाच्या डावीकडून* ***पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या भागावर*** अनुक्रमे ऑडीटकरिता असलेल्या तिकीटाच्या भागावर "A", दरवाजावर असलेल्या व्यक्तीकडे ठेवण्यात येणाऱ्या तिकीटाच्या भागावर "D" व प्रेक्षकांकडे असणाऱ्या तिकीटाच्या भागावर "P" अशी अद्याक्षरे छापण्यात यावीत.

iv) प्रत्येक तिकीटावर सिरीयल नंबर, रोल नंबर, तिकीटधारकाने प्रवेश करावयाची प्रवेशद्वार, प्रवेश शुल्क, ऑनलाईन तिकीटाकरिता आकारण्यात आलेला सेवाआकार / कन्व्हेनियन्स चार्ज तसेच एकूण प्रवेश शुल्कावर देय करमणूक शुल्क या बाबींचा उल्लेख करण्यात यावा.

v) तिकीटाचे ऑनलाईन आरक्षण करणाऱ्या व्यक्तीस संकेतांक देऊन त्या व्यक्तीने सदर संकेतांक तसेच ओळखपत्र तिकीटविक्री केंद्रावर उपलब्ध करुन दिल्यास त्याला आरक्षित केलेले तिकीट उपलब्ध करुन देण्यात यावे.

vi) प्रत्येक तिकीट धारकास तिकीटावर नमूद प्रवेशद्वारातूनच स्टेडियममध्ये प्रवेश देणे आवश्यक असून तिकीटधारकाने आरक्षित केलेल्या जागेवर जाण्याकरिता त्याला एका यंत्राच्या समोरुन जाणे आवश्यक असल्याने याकरिता तिकीटावर बार कोड देण्यात यावा. तिकीटाच्या तीन भागांपैकी प्रथम भाग स्टेडीयममध्ये आत जाताना सुरक्षा रक्षकास संबंधित व्यक्तीने उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

vii) महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियमातील कलम **४(२)(ब)** नुसार अभिकर्त्याने संगणकीकृत तिकीट विक्री करण्याकरिता **जिल्हाधिकारी, मुंबई शहर** यांचेकडून तिकीटाचा नमूना प्रमाणित करुन घ्यावा. तसेच तिकीटाकरिता वापरण्यात येणारा रोल करमणूक शुल्क अधिकाऱ्यांमार्फत दिनांक व स्वाक्षरीसह मुद्रांकित करुन प्रमाणित करुन घ्यावा.

viii) **तिकीट विक्रीकरिता** तसेच **कायदा व सुव्यवस्थेच्या** दृष्टीकोनातून तिकीट विक्री केंद्रास मान्यता देण्याकरिता पोलीस आयुक्त, मुंबई या सक्षम प्राधिकाऱ्यांची आवश्यक ती मान्यता घेण्यात यावी.

***II आय.पी.एल. सामन्यांवर देय करमणूक शुल्क :-***

i. वानखेडे स्टेडियम, मुंबई येथे होणाऱ्या **प्रत्येक आय.पी.एल. २०-२० क्रिकेट सामन्याकरिता ३३,१०६ इतक्या संपूर्ण आसन क्षमतेवर** महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियमाच्या **कलम ३(१)(ब)** मधील तक्त्यात **"बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्राकरिता"** विहित करण्यात आलेल्या **२५ % इतक्या दराने करमणूक शुल्क लागू होईल.**

ii. आय.पी.एल. सामन्यांच्या ऑनलाईन तिकीट विक्रीकरिता प्रती तिकिट कमाल रू. १०/- पर्यंत **सेवा आकार / कन्व्हेनियन्स चार्ज** आकारल्यास त्यावर करमणूक शुल्क लागू होणार नाही. या निश्चित

सेवाआकार / कन्व्हेनियन्स चार्जच्या रकमेव्यतिरिक्त अधिकची रक्कम **सेवाआकार / कन्व्हेनियन्स चार्ज** म्हणून आकारल्यास अश्या आकाराचा तिकीटावर स्वतंत्र उल्लेख करण्यात यावा.

iii. तिकीटावरील प्रवेशशुल्क तसेच रु.१०/- एवढा निश्चित सेवा आकार/ कन्व्हेनियन्स चार्ज वगळून उर्वरित सेवा आकाराची / कन्व्हेनियन्स चार्जची रक्कम अशा संपूर्ण रकमेवर महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियमाच्या **कलम ३(१)(ब)** मधील तक्त्यात **“बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्राकरिता”** विहित करण्यात आलेल्या **२५ % इतक्या दराने करमणूक शुल्क लागू होईल**. ऑनलाईन तिकीट विक्रीबाबतचे स्वतंत्र विवरण प्रत्येक आय.पी.एल. सामना संपल्यानंतर पुढील **दोन कार्यालयीन दिवसात** जिल्हाधिकारी, मुंबई शहर कार्यालयास अभिकर्ता यांनी उपलब्ध करुन देणे व अनुज्ञेय करमणूक शुल्काचा भरणा करणे अभिकर्ता यांना अनिवार्य राहील.

iv. प्रत्येक सामन्यांपूर्वी किमान एक दिवस अगोदर स्टेडियमच्या एकूण आसन क्षमतेच्या प्रमाणात देय करमणूक शुल्का एवढी **अनामत रक्कम** सदर संस्थेने जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडे जमा करणे बंधनकारक राहील.

v. जमा होणारा करमणूक शुल्क जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांनी “००४५, विक्रेय वस्तू व सेवा यावरील इतर कर व शुल्क, उपशिर्ष १०१” या लेखाशिर्षाखाली जमा करावा. तसेच, अभिकर्त्याने भरणा केलेल्या अनामत रक्कमेतून शासनास देय करमणूक शुल्क समायोजित करुन उर्वरित रकमेचा परतावा लेखाहिशोब सादरीकरणानंतर **४ आठवडयांमध्ये** संबंधितांना करण्यात यावा.

vi. *आयपीएल सामन्यांकरीता* ***तिकीट विक्री न झालेल्या तिकीटाचे उर्वरित रोल जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या कार्यालयात शेवटचा सामना संपल्यानंतर ५ दिवसांच्या कालावधीत*** *जमा करण्यात यावेत. तसेच,* ***प्रत्येक सामन्याचे लेखाहिशोब*** *अभिकर्त्याकडून जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांना मालिकेचा शेवटचा सामना संपल्यानंतर* ***पाच कामकाजाच्या दिवसात*** *सादर करण्यात यावेत.*

vii. सर्व तिकीटांच्या **स्थळप्रती** (Counterfoils) सामने संपल्यानंतर **२ महिने कालावधीकरिता** जतन कराव्यात. तद्नंतर सदर स्थळप्रतीचे नाशन संबंधित करमणूक शुल्क निरिक्षक यांनी स्वत:च्या उपस्थितीत करुन घेऊन नोंदवहीत दिनांकित स्वाक्षरी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१७१४५५३६७९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Madhavrao Doke

Digitally signed by Sharad Madhavrao Doke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49a6844e93d7a1180c3226081e6f456ddf8d7b1bc67bc4bd78fa78029ab559db, serialNumber=b6d84b8aafc59276d709cc7218691343d053ce00524eb05a7fb23fbfe5a5b2c6, cn=Sharad Madhavrao Doke
Date: 2017.03.17 17:55:54 +05'30'

**( शरद डोके )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत, आवश्यक त्या तात्काळ कार्यवाहीकरिता अग्रेषित,**
अपर जिल्हाधिकारी, मुंबई शहर.

**प्रत माहितीसाठी,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुबई.
२) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुबई.

३) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुबई.
४) प्रधान सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, महसूल विभाग, मंत्रालय, मुबई.
५) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
७) प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा, लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर.
९) प्राधिकृत स्वाक्षरीकर्ता, मे. इंडियाविन स्पोर्टस् प्रा. लि., ३ रा मजला, कोर्टहाऊस, लोकमान्य टिळक मार्ग, धोबी तलाव, मुंबई-०२.
१०) उप सचिव (टी-१) यांचे स्वीय सहायक, महसूल विभाग, मंत्रालय, मुबई.
११) निवड नस्ती (टी-१).